**उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय महाविद्यालये/संस्थांमधील प्राचार्य/ संचालक या पदाच्या सन २०१७ मधील बदल्यांबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली-२०१७ (९०/१७)/मशि-१**
मंत्रालय विस्तार, मादाम कामा मार्ग
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
तारीख : ३१ मे, २०१७.

# आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्य पार पडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ३(१) मध्ये विहीत केलेल्या तरतूदीस अनुसरुन उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय महाविद्यालये/संस्थांमधील प्राचार्य/संचालक या संवर्गातील ज्या प्राचार्य/संचालक यांचा कालावधी बदल्यांच्या अधिनियमातील कलम ३(१) मध्ये विहित केलेल्या कालावधीपेक्षा जास्त झालेला आहे त्यांच्या खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे परिणामस्वरूपत: (Resultant) बदल्या करण्यात येत.

| अ. क्र. | प्राचार्य/संचालकांची नावे | सध्या कार्यरत असलेले महाविद्यालये/संस्था | बदलीचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | डॉ.वसंत हेळवी | प्राचार्य, राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर | संचालक, शासकीय विज्ञान संस्था, मुंबई | प्रशासकीय |
| २ | डॉ.अण्णासाहेब खेमनार | प्राचार्य, सिडनहॅम वाणिज्य व अर्थशास्त्र महाविद्यालय, मुंबई | प्राचार्य, राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर | प्रशासकीय |
| ३ | डॉ. संगिता पकडे | संचालक, शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती | प्राचार्य, सिडनहॅम वाणिज्य व अर्थशास्त्र महाविद्यालय, मुंबई | प्रशासकीय |

**डॉ. संगिता पकडे यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या संचालक, शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती या पदाचा अतिरिक्त कार्यभार तात्पुरत्या स्वरुपात विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, अमरावती यांचेकडे पुढील आदेश होईपर्यंत सोपविण्यात येत आहे.**

प्रशासकीय कारणास्तव बदली झालेल्या प्राचार्य/संचालक यांना शासन नियमानुसार पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहिल.

बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ होण्याकरीता संचालक, उच्च शिक्षण यांनी खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

१. बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर बदली झालेल्या प्राचार्य/संचालकांनी पर्यायी प्राचार्य/संचालक हजर होण्याची वाट न पाहता प्राचार्य/संचालक पदाचा कार्यभार सेवाज्येष्ठ अध्यापकाकडे सोपवून व त्याबाबतची माहिती संचालक व सहसंचालक, उच्च शिक्षण यांना देऊन बदलीच्या ठिकाणी रूजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त व्हावे.

२. पदस्थापनेत बदल करण्यासंदर्भात कोणत्याही विनंतीची दखल घेण्यात येणार नाही. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही प्राचार्य/संचालक यांनी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे प्राचार्य/संचालक शिस्तभंगविषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

३. बदली झालेल्या ठिकाणी रुजू होईपर्यंतच्या कालावधीत कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येणार नाही.

४. सदर बदल्यांची अंमलबजावणी प्रभावीपणे होणे गरजेचे असल्यामुळे बदली झालेल्या सर्व प्राचार्य/संचालक यांच्या कार्यमुक्ततेच्या दिनाकांपर्यंत अथवा जास्तीत जास्त **दिनांक ३०.६.२०१७** पर्यंतचे वेतन ते सध्या कार्यरत असलेल्या महाविद्यालय/संस्थेने काढावे. त्यानंतरचे वेतन कोणत्याही परिस्थितीत बदलीपूर्वीच्या महाविद्यालय/संस्थेकडून काढण्यात येऊ नये, सदर वेतन संबंधित प्राचार्य/संचालक बदलीच्या महाविद्यालय/संस्थेत रुजू झाल्यानंतर बदलीनंतरच्या महाविद्यालय/संस्थेने काढावे. **दिनांक ०१.७.२०१७** पासूनचे वेतन बदलीपूर्वीच्या कार्यरत असलेल्या महाविद्यालय/संस्थेतून काढण्यात आल्यास त्या महाविद्यालय/संस्थेतील आंहरण व संवितरण अधिकारी यांना व्यक्तीशः जबाबदार धरण्यात येईल.

५. हे आदेश तात्काळ अंमलात येतील, बदली झालेले प्राचार्य/संचालक कार्यमुक्त होऊन बदलीच्या ठिकाणी रुजू झाल्याबाबतचा अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी **दिनांक ०१.७.२०१७** पूर्वी शासनास सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५३११०४६२६२९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manisha P Kini

Digitally signed by Manisha P Kini
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=108cbdac08c7e940866a8fc97bfe7f861bf192ce9dd6b4d0924623149a51f9ed, cn=Manisha P Kini
Date: 2017.05.31 16:45:34 +05'30'

**(म. प्र. किणी)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण
३. सर्व प्राचार्य/संचालक, शासकीय महाविद्यालये/संस्था
४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर
६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
७. सर्व संबंधित प्राचार्य/संचालक
८. निवड नस्ती.

**प्रत :-** १. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव